सायन पनवेल महामार्गावर ठाणे खाडीवर तिसऱ्या पुलाचे बांधकाम करणे तसेच प्रकल्पाच्या सवलत करारनाम्यास मान्यता देणे. (ठाणे खाडी पूल-३).

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः खाक्षेस-२०१८/प्र.क्र. ३०४/रस्ते-०८.**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०१ ऑक्टोबर, २०१८.

**वाचा**

१) शासन निर्णय, क्र. खाक्षेस- २०१६/ प्र.क्र. ४६७/रस्ते-८, दि.१९.०८.२०१६.
२) शासन निर्णय, क्र. खाक्षेस- २०१७/ प्र.क्र. ८८ /रस्ते-८, दि.२४.११.२०१७.

**प्रस्तावना :-**

मंत्रीमंडळाच्या पायाभूत सुविधा समितीने दिनांक ३०.११.२०१५ रोजीच्या बैठकीमध्ये व तद्नुषंगाने १९.०८.२०१६ रोजी निर्गमित केलेल्या शासन निर्णयानुसार सायन पनवेल महामार्गावर ठाणे खाडीवर तिसऱ्या पुलाचे बांधकाम करणे (ठाणे खाडी पूल-३), या प्रकल्पाकरीता महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास कार्यान्वयीन यंत्रणा म्हणून घोषित करण्यात आले. तद्नंतर दि.१३.०६.२०१७ रोजीच्या पायाभूत सुविधा समितीच्या बैठकीमध्ये व तद्नुषंगाने दि.२४.११.२०१७ रु.७७५.५८ कोटी किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली. तसेच प्रकल्प खर्च वसुल करण्यासाठी ऑक्टोबर २०२७ ते सप्टेंबर २०३६ पर्यंत सवलत कालावधी निश्चित करण्यास मान्यता देण्यात आली.

या अनुषंगाने सदर प्रकल्पाकरीता महाराष्ट्र शासन, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ व या प्रकल्पाचे विशेष उद्देश वाहन - ठाणे क्रिकब्रीज इन्फ्रास्ट्रक्चर लिमिटेड यांच्यामध्ये करावयाच्या सवलत करारनाम्याच्या प्रारुपास व त्यानुसार सवलत करारनामा करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याअनुषंगाने मंत्रिमंडळ पायाभूत सुविधा समितीच्या दिनांक २९.०८.२०१८ रोजी झालेल्या बैठकीत सदर बाबीस मान्यता देण्यात आलेली आहे. यानुसार आता शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

सायन पनवेल महामार्गावर ठाणे खाडीवर तिसऱ्या पुलाचे बांधकाम करणे (ठाणे खाडी पूल-३) या प्रकल्पाची विशेष उद्देश वाहन (Special Purpose Vehicle ) कंपनीद्वारे अंमलबजावणी , निधी उभारणी इत्यादी साठी महाराष्ट्र शासन (as the Authority - " प्राधिकरण " of one part), महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ ( as the " MSRDC" or " Sponsor" - प्रायोजक of Second Part ) व विशेष उद्देश वाहन - ठाणे क्रिकब्रीज इन्फ्रास्ट्रक्चर लिमिटेड ( of the other Part ) यांच्यातील करावयाच्या करारनाम्याच्या प्रारुपास शासनाची खालीलप्रमाणे मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१) सायन पनवेल महामार्गावर ठाणे खाडीवर तिसऱ्या पुलाचे बांधकाम करणे (ठाणे खाडी पूल-३) या प्रकल्पाकरिता महाराष्ट्र शासन, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ लिमिटेड, व विशेष उद्देश वाहन - ठाणे क्रिकब्रीज इन्फ्रास्ट्रक्चर लिमिटेड यांच्या दरम्यान करावयाच्या सवलत करारनाम्याच्या प्रारुपास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२) तसेच, महाराष्ट्र शासन, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ लिमिटेड व विशेष उद्देश वाहन - ठाणे क्रिकब्रीज इन्फ्रास्ट्रक्चर लिमिटेड यांच्या दरम्यान उपरोक्त करारनाम्यानुसार सवलत करारनामा करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३) सायन पनवेल या रस्त्यावरील वाहतुक कोंडी सोडविण्यासाठी पर्याय म्हणून तुर्भे ते खारघर बोगद्याच्या प्रकल्पाबाबत महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ यांनी सुसाध्यता तपासावी. सिडको आणि एम.आय.डी.सी. यांनी या प्रकल्पात महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ यांच्यासोबत सहभागी होऊन या प्रकल्पासाठी लागणाऱ्या जमिनीच्या उपलब्धतेबाबत व प्रकल्पासाठी लागणाऱ्या भाग वित्तीय सहाय्य करावे.

सदर शासन निर्णय, नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ८४/१४३३, दि. २४.०८.२०१८ तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. १५९/२०१८/व्यय-११, दि. २१.०८.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीसअनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००११७३२१९३०१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Avinash Trimbakrao Dhondge

Digitally signed by Avinash Trimbakrao Dhondge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=c027c83219049ab50c11c48a886d96688cd20f344566980536900a21e1d9a74b,
serialNumber=4be0cd9a533d89e3ab5f3d01c44606657e57bbf30754f79095f947378c30d155, cn=Avinash Trimbakrao Dhondge
Date: 2018.10.01 17:34:49 +05'30'

(अविनाश त्रिं.धोंडगे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत -**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम, मंत्रालय, मुंबई
४) मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम), मंत्रालय, मुंबई
५) मा.राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम, मंत्रालय, मुंबई
६) मा.राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम), मंत्रालय, मुंबई.
७) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
८) सर्व विधानसभा सदस्य / विधानपरिषद सदस्य.
९) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई

१०) अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई
११) अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई
१२) प्रधान सचिव (महसूल व वन विभाग), मंत्रालय, मुंबई
१३) प्रधान सचिव (विधि व न्याय विभाग), मंत्रालय, मुंबई
१४) प्रधान सचिव (नगर विकास विभाग), मंत्रालय, मुंबई
१५) प्रधान सचिव (उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग), मंत्रालय, मुंबई
१६) सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, म.रा.र.वि. महामंडळ, वांद्रे, मुंबई-५०
१८) सर्व मंत्रालयीन विभाग
१९) निवड नस्ती (रस्ते-८), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.